**श्री. र. र. गढरी, यांना कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : कअनि-१११०८/प्र.क्र.८६/१४-ब,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ** : सा.प्र.वि. आदेश क्रमांक कअप-१२१६/प्र.क्र.४०/१४ ब, दिनांक ०२.०२.२०१७

**आदेश**

सहायक पदावरुन कक्ष अधिकारी पदावर पदोन्नतीसाठी तयार करण्यात आलेल्या सन २००१-२००२ च्या नियमित निवडसूचीमध्ये भज(क) प्रवर्गामधून, श्री. र. र. गढरी, यांनी नियमित पदोन्नतीचा दिनांक, मानीव दिनांक म्हणून मिळणेबाबत निवेदन सादर केले होते. सदर निवेदनाच्या अनुषंगाने श्री. र. र. गढरी, यांचा प्रस्ताव शासन स्तरावर सादर करण्यात आला असता, श्री. र. र. गढरी, यांना कक्ष अधिकारी पदावरील मानीव दिनांक देण्यास मंजूरी दिली आहे.

२. श्री. र. र. गढरी, हे सन २००१-२००२ या वर्षीच्या निवडसूचीमधून कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी पात्र ठरले असल्याने, त्यांना दिनांक ०१.०६.२००२ हा कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

३. सदर कक्ष अधिकारी पदावरील नियमित पदोन्नतीचा मानीव दिनांक मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून, तसेच मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक २९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३, ३३७४/२०११ वरील अंतिम निकालाच्या अधीन राहतील.

४. श्री. र. र. गढरी यांना कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्रमांक १७९/९४ मधील न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने देण्यात येत आहे. यास्तव श्री. गढरी,यांना मा. न्यायाधिकरणाच्या निर्णयानुसार त्यांना वेतन व भत्याची कोणतीही थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही. सदर मानीव दिनांक केवळ वेतन निश्चिती आणि ज्येष्ठतेसाठी अनुज्ञेय राहील.

५. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६८९/का.१२ दिनांक ०१.१२.२०१६ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६७४/१६/सेवा-३, दिनांक २७.१२.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०२२८१७५१३६९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.02.28 17:53:17 +05'30'

**( ग. भि. गुरव )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) अ.मु.स./प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) सह/ उप सचिव (आस्थापना), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अवर सचिव कार्यासन १२/कार्यासन १६ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) श्री. र. र. गढरी, अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) कार्यासन अधिकारी(आस्थापना), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) कार्यासन अधिकारी (कार्यासन १४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) निवडनस्ती (कार्यासन १४-ब).